# सत्यापलाप

**लेखक :** प्रियदर्शिनी कर्वे

काही वर्षांपूर्वी गणपतीच्या मूर्ती दूध पिताहेत अशी अफवा उठून देशभरात कसा गोंधळ उडाला होता, हे काहीजणांना आठवत असेल. या घटनेची एक मोठी बातमी झाली होती त्यावेळी. पण आज जवळजवळ रोजच कोणत्याना कोणत्या अफवा आणि सत्यापलापांना शेकडो-हजारो लोक बळी पडत आहेत. मात्र रोज मरे त्याला कोण रडे या न्यायाने काही मोठा परिणाम होत नसेल तर याची फारशी दखलही घेतली जात नाही.



**गणपती दूध पितो !!**

https://www.bbc.com/news/world-asia-india-40749640

उदा. गेल्या काही महिन्यांत मुले पळवणाऱी टोळी फिरते आहे, अशा अफवा पूर्वेकडच्या काही राज्यांमध्ये व्हॉट्सॅपच्या माध्यमातून पसरल्या. त्यातून काही अनोळखी लोकांचे जमावाकडून मारहाण करून खून झाले. काही आठवड्यांपूर्वी हाच दुर्दैवी प्रकार आपल्या पुरोगामी महाराष्ट्रातही झाला. निष्पाप माणसे हकनाक जीवाला मुकल्यामुळे याची बातमी झाली. मात्र समाजमाध्यमातून अशा अक्षरशः शेकडो खोट्या वार्ता किंवा फेक न्यूज दररोज पसरत आहेत, त्यातून आपली मानसिकता, आपली विचारसरणी बदलवली जाते आहे. आपल्या मूलभूत धारणा, आपली मूल्ये जर खोट्या वार्तांच्या पायावर उभी राहणार असतील, तर आपण आपले आयुष्य एका भासमय मायावी जगात जगणार आहोत, वास्तवाशी आपली पूर्ण फारकत होणार आहे. एका अर्थाने हा आपला खूनच आहे ! पण लक्षावधी लोक रोज या पध्दतीने मरत असूनही याची बातमी होत नाही. या सामुदायिक हत्याकांडाच्या परिणामांचे प्रतिबिंब मात्र गेल्या काही वर्षांतल्या जगभरातल्या राजकीय आणि सामाजिक उलथापालथींमध्ये पडलेले दिसून येते. अमेरिकेत सध्याचे राष्ट्राध्यक्ष डोनाल्ड ट्रम्प निवडून येण्यामागे जनमत त्यांच्या बाजूने वळण्यासाठी समाजमाध्यमांतून रशियाच्या हस्तकांनी पसरवलेल्या खोट्या वार्तांचाही हातभार लागला होता, हे सिध्द झाले आहे. आता तिथे जी चौकशी चालू आहे, ती केवळ यामध्ये ट्रम्प यांची प्रचारयंत्रणाही सहभागी होती का हा सारा केवळ रशियन सरकारचा खोडसाळपणा होता, हे शोधून काढण्यासाठी आहे. भारतातही गेल्या चार-पाच वर्षांत खोट्या वार्तांच्या माध्यमातून पध्दतशीरपणे समाजात विष कालवले जात आहे, आणि त्याची परिणती मनात खोलवर रुजलेले सामाजिक भेदभाव नव्याने उफाळून अतिशय क्रूरपणे व्यक्त होण्यात झालेली आहे.




ऑक्सफर्ड शब्दकोशाने जगभरात खोट्या वार्तांमुळे होत असलेल्या या सामाजिक स्थित्यंतराची दखल घेत २०१६ साली पोस्टट्रुथ किंवा सत्योत्तर हा त्या वर्षीचा शब्द म्हणून जाहीर केला होता.

वर दिलेल्या मुले पळवणाऱ्या

टोळीच्या अफवेचा आणि तिच्या परिणामांचा विचार केला, तर हा रोग किती खोलवर गेला आहे, हे दिसून येईल. मुले पळवणारी टोळी आपल्या आजुबाजूला कार्यरत आहे, अशा अफवा अधूनमधून पसरतच असतात. यावेळी या अफवेबरोबर रस्त्यावरून एक लहान मूल उचलले जात असल्याचा एक व्हिडिओ असल्यामुळे ही अफवा जास्त परिणामकारक ठरली. हा व्हिडिओ प्रत्यक्षात पाकिस्तानमधला आहे, आणि तोही मुलांच्या अपहरणासंदर्भात जनजागृती करण्यासाठी बनवलेल्या माहितीपटामधला आहे, असे सत्यशोधन करणाऱ्यांनी दाखवून दिले आहे. पण अर्थातच ही माहिती खोट्या वार्तेइतक्या परिणामकारकतेने पसरली नाही. पण त्याहीपुढे जाऊन या अफवेचा परिणाम काय झाला ते पाहिले, तर जे घडले ते केवळ या एका संदेशामुळे घडले असे म्हणता येणार नाही.

मुले पळवली जात असल्याची भीती निर्माण झाली तर मुलांना एकटे न सोडणे, त्यांच्यावर जास्त देखरेख ठेवणे, त्यांची जास्त काळजी घेणे, अशा प्रतिबंधात्मक प्रतिक्रिया स्वाभाविक आहेत. कदाचित परिसरात नव्या दिसणाऱ्या लोकांबद्दल संशय वाटणे, त्यांच्याशी संपर्क टाळणे, मुलांना त्यांच्याजवळ जाऊ न देणे, याही प्रतिक्रिया येऊ शकतात. त्यामागे वाईट कृत्ये करणारी माणसे ही 'बाहेरची'च असणार, 'आपल्या' समाजातली असणारच नाहीत, हा अवैज्ञानिक अंधविश्वास आहे, पण तो एक वेगळाच विषय आहे. आपल्या परिसरात एक अनोळखी माणूस दिसतो आहे, तो आपली भाषा बोलू शकत नाही, आपल्यासारखा दिसत नाही, तो पत्त्याची चौकशी करतो आहे तेव्हा तो इथला नाही, अशा कारणांमुळे जमाव करून त्या माणसाला मरेपर्यंत मारहाण केली जाते, तेव्हा यामागे केवळ मुलांच्या सुरक्षिततेची भीती हे कारण असत नाही. समाजमाध्यमांतून गेल्या काही वर्षांत वेगवेगळे सत्यापलाप आपल्या कानांवर आणि डोळयांवर आदळत गेले आहेत. त्यातून जातींबद्दल, धर्मांबद्दल, आचार, आहार, चालीरीती, इ. बद्दल अनेक गैरसमज पसरवले गेले आहेत, धार्मिक, जातीय, भाषिक आणि प्रादेशिक अस्मिता डिवचल्या गेल्या आहेत. त्यातून आपले ते सारे उत्तम आणि श्रेष्ठ, आणि आपल्यापेक्षा वेगळे म्हणजे टाकाऊ, वाईट, दुष्ट, विनाशकारीच आहे, हा अतिशय घातक विचार हळूहळू रुजत गेला आहे. या पार्श्वभूमीवर

मुले पळवणाऱ्या टोळीची अफवा म्हणजे उंटाची पाठ मोडायला कारणीभूत झालेली त्याच्या पाठीवर लादलेल्या ओझ्यातली शेवटची काडी असे म्हणता येईल. 'बाहेरच्या' लोकांमुळे आपली संस्कृती 'खतरेमे' असल्याची लोकांच्या मनात खदखदणारी असुरक्षिततेची भावना आणि दाटलेला संताप या अफवेमुळे उफाळून वर आला, आणि खतरा निर्माण करणाऱ्याचा जो कोणी प्रतिनिधी समोर दिसला / वाटला, त्याच्यावर कोसळला.

**समाजमाध्यमातून खोटी वार्ता आल्यास काय करावे?**

अशी वार्ता पाठवणाऱ्या व्यक्तीला ह्या माहितीचा स्रोत विचारा. आपण या मजकुराला खोटी वार्ता का म्हणतो आहोत, याचे स्पष्टीकरण त्यांना द्या. तुम्ही हा मजकूर पुढे पाठवू नका, आणि आपण असे करणार आहोत, हे पाठवणाऱ्याला कळवा व पुढे न पाठवण्याची विनंती करा. ही व्यक्ती तरीही अशा फालतू गोष्टी तुम्हाला पाठवतच राहिली, दोन-तीन संधी देऊनही त्यांत बदल झाला नाही, तर तिला आपल्या मित्रपरिवारातून कारण जाहीर करून सन्मानपूर्वक निरोप द्या !

खोट्या वार्तांना मोठ्या संख्येने लोक बळी पडतात, याचे महत्त्वाचे कारण म्हणजे त्यांच्यात असलेला वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अभाव. वैज्ञानिक दृष्टिकोन आपल्याला भावनेच्या आहारी न जाता समोर येणारी प्रत्येक गोष्ट बुध्दीच्या निकषांवर तपासून बघायला शिकवतो. आज व्हॉट्सॅपसारख्या समाजमाध्यमावर केवळ आपल्या परिचयाच्या व्यक्तीने पुढे ढकलला आहे, येवढी शिफारस आपल्याला कोणत्याही अतार्किक संदेशावर विश्वास ठेवायला पुरेशी ठरते आहे. आपल्यात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजलेला नाही, याचेच हे लक्षण आहे. बरेचदा काही खोट्या वार्ता नामांकित लोक आपली विश्वसनीय माहिती म्हणून उद्धृत करतात. काही वार्ता इतक्या प्रभावी ठरतात की मुख्य प्रवाहातल्या माध्यमांमध्येही अधिकृत बातमी म्हणून त्यांना स्थान मिळते. एखादी गोष्ट धादांत खोटी आहे, हे माहीत असूनही, ती आपल्या विचारधारेला पूरक आहे म्हणून जास्तीतजास्त लोकांपर्यंत पोहोचवण्याच्या हेतून पुढे ढकलणारे महाभागही मला भेटले आहेत. इतर लोकांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अभाव

असल्यामुळे, लोकांना आपले मत पटवण्याचा हा कमी कष्टाचा मार्ग आहे, असे काहींना प्रामाणिकपणे वाटत असेलही पण ही शुध्द फसवणूक आहे. काही राजकीय हेतूने प्रेरित मतप्रवाह मुळात आपली बाजू लंगडी असल्यामुळे बनवेगिरी करूनच लोकांना पटवावे लागणार आहे, हे ओळखून पध्दतशीरपणे या मार्गावर निघाले आहेत, आणि त्यात यशस्वीही होत आहेत, ही त्यापेक्षा गंभीर बाब आहे.

खोट्या वार्ता आपल्या बुध्दीवर कशा ताबा मिळवतात याचे उदाहरण म्हणून शिक्षणक्षेत्राशी संबंधित असलेल्या आणि गेली कित्येक वर्षे अनेकदा पसरवल्या गेलेल्या एका खोट्या वार्तेचे थोडे विश्लेषण करूया.




https://thewire.in/history/macaulays-speech-never-delivered

फेसबुक गेली चार-पाच वर्षे वापरत असलेल्या बहुतेक प्रत्येकाने ब्रिटिश राजवटीत शिक्षणव्यवस्थेचा पाया घालणाऱ्या थॉमस मकॅलेने ब्रिटिश संसदेत केलेल्या भाषणाचा अंश

अशा आशयाची एक पोस्ट कधी ना कधी पाहिली असेल. ‘द वायर’ या इ-वार्तापत्राने या पोस्टमधील सत्यापलापाचा बुरखा फाडला आहे. या पोस्टनुसार मकॅलेने २ फेब्रुवारी १८३५ या तारखेला लंडनमध्ये ब्रिटिश संसदेत केलेल्या भाषणात असे म्हटले की *मी भारतभर फिरलो आणि कोठेही मला एकही भिकारी दिसला नाही, किंवा कोणतीही गुन्हेगारी दिसली नाही. येथे इतकी सुबत्ता आहे, इतकी उच्च नीतीमत्ता आहे, इथली माणसे इतक्या उच्च दर्जाची आहेत, की या राष्ट्राचा कणा असलेला आध्यात्मिक आणि सांस्कृतिक वारसा मोडून काढल्याखेरीज आपण या समाजाला कधीही हरवू शकणार नाही. तेव्हा इथल्या प्राचीन शिक्षण पध्दतीला आणि संस्कृतीला पर्यायी व्यवस्था उभी करावी, असा मी प्रस्ताव मांडतो. जे काही परदेशी आहे, इंग्लिश आहे, ते चांगले आणि आपल्यापेक्षा वरच्या दर्जाचे आहे, असे जेव्हा भारतीय समजतील, तेव्हा त्यांचा आत्मसन्मान नाहीसा होईल, ते त्यांची संस्कृती गमावून बसतील, आणि आपल्या अपेक्षेप्रमाणे भारत आपले सच्चे मांडलिक राष्ट्र बनेल.*

मकॅले हा पक्का वसाहतवादी आणि वंशश्रेष्ठत्ववादी विचारांचा माणूस होता. युरोपपलीकडच्या जगातल्या साऱ्या ‘गरीब बिचाऱ्या मागास’ लोकांचा उद्धार करण्याचे उदात्त कार्य ईश्वराने आपल्यावर सोपवले आहे, या विचारातून सारेच ब्रिटिश व इतरही युरोपीय आपल्या वसाहतवादाचे समर्थन करत होते आणि मकॅले त्यांचा सच्चा प्रतिनिधी होता. मकॅलेने जी शिक्षणव्यवस्था भारतात प्रस्थापित केली, ती मुख्यतः ब्रिटिश साम्राज्याचा गाडा हाकण्यासाठी लागणारे कुशल व निष्ठावान कामगार पुरवणे यासाठीच होती, हे वादातीत आहे. पण या शिक्षणपध्दतीमुळे ब्राम्हणतेरांना शिक्षणाची कवाडे उघडी झाली आणि याच गुलामीचा पुरस्कार करणाऱ्या शिक्षणातूनही काही लोकांमध्ये स्वातंत्र्याची आकांक्षा जागी झाली, ही वस्तुस्थितीही नाकारता येणार नाही. मकॅलेचे जे लिखाण प्रसिध्द आहे, त्यातून त्याचा वंशश्रेष्ठत्ववादी विचार ठळकपणे पुढे येतो. त्यामुळे असा माणूस लंडनमध्ये संसदीय भाषणात भारतीय समाजव्यवस्था आणि संस्कृती थोर आहे, वगैरे म्हणेल हे अविश्वसनीय आहे.

मकॅलेच्या तोंडी घातलेल्या या मजकुरात इतिहासाविषयीचे अज्ञान आणि गैरसमज ठासून भरलेले आहेत. १८३५ सालापर्यंत ब्रिटिशांनी संपूर्ण भारतात आपला अंमल प्रस्थापित

केलेला होता. थोडक्यात म्हणजे भारतीयांना गुलाम बनवण्याचे काम पूर्ण झालेले होते. त्याआधी भारत वेगवेगळ्या सुभेदारांच्या, राजांच्या, सुलतानांच्या अधिपत्याखालच्या अनेक तुकड्यांमध्ये विभागलेला होता, राष्ट्र म्हणून त्याची कोणतीही एकसंध ओळख नव्हती. यातले जवळजवळ प्रत्येक राज्य घशात घालण्यासाठी ब्रिटिशांनी भेदनीतीचा यशस्वी वापर केला होता. ब्रिटिश हे करू शकले कारण प्रत्येक ठिकाणी कोणत्या ना कोणत्या आमिषाला बळी पडून स्थानिक भारतीय माणसांनीच फितुरी केलेली होती, आणि आपल्याच माणसांशी दगाबाजी केली होती. या पार्श्वभूमीवर कोणी ब्रिटिश भारतीयांना नीतीमान आणि उच्च दर्जाचे लोक वगैरे केवळ उपरोधानेच म्हणाला असता. याच काळात पेंढाऱ्यांच्या लूटमारीने उत्तर भारतात धुमाकूळ घातलेला होता. उदरनिर्वाहाचे दुसरे कोणतेही साधन नसल्याने मोठ्या संख्येने लोकांना या वाटेवर ढकलले होते. त्यामुळे मकॅलेला त्याच्या आजुबाजूला गुन्हेगार आणि भिकारी दिसले नाहीत, हे वक्तव्य वास्तवाला अजिबात धरून नाही.

मकॅलेचे हे तथाकथित भाषण पूर्णतः थोतांड आहे, याचे अनेक प्रत्यक्ष पुरावेही आहेत. ज्या दिवशी त्याने हे भाषण केल्याचे उद्धृत केलेले आहे, त्या दिवशी तो कलकत्त्यामध्ये होता. आपल्या भारतातील वास्तव्यात मकॅलेने आपल्या बहिणीला अनेक पत्रे लिहिली, आणि त्यांत आपल्या अनुभवांचे व विचारांचे सविस्तर वर्णन केले आहे. १८३४ ते १८३८ हा पूर्ण चार वर्षांचा कालावधी मकॅले भारतात होता. आता १९व्या शतकात ब्रिटिशांकडे इंटरनेट व व्हिडिओ कॉन्फरन्सिंगची सोय होती (महाभारतकालीन असे हे आपले स्वदेशी तंत्रज्ञान तेव्हा ब्रिटिशांनी भारताकडून ढापले बहुधा!) असे म्हणायचे असेल तर वेगळी गोष्ट आहे, पण त्या काळात भारतातून इंग्लंडला जाऊन परत येण्याचा कालावधी आणि त्याने आपल्या बहिणीला भारतातून लिहिलेल्या पत्रांवरील तारखा विचारात घेता मजकुरात दिलेल्या दिवशी मकॅले ब्रिटिश संसदेत हजर असण्याची सुतराम शक्यता नाही. ब्रिटिश संसदेच्या कामकाजाच्या त्या दिवशीच्या नोंदीमध्येही असा काही उल्लेख नाही. शिवाय मकॅलेला भारतात व्हॉइसरॉयचा सल्लागार म्हणून शिक्षणव्यवस्था उभारण्याच्या कामासाठीच पाठवण्यात आले होते, तेव्हा त्याने आपल्या कार्यकालाच्या मध्येच संसदेत भाषण

ठोकण्याची आणि शिफारस करण्याची काहीच गरज नव्हती. मॅकॅलेच्या या तथाकथित भाषणाच्या संपूर्ण मजकुरात जी भाषा वापरली आहे, ती आधुनिक इंग्रजी वळणाची आहे. १८३५ साली बोलली-लिहिली जाणारी इंग्रजी भाषा यापेक्षा फार वेगळी होती.

### खोटी वार्ता कशी ओळखाल?

- मजकूर लेखात दिलेल्या प्रकारांपैकी एखाद्या स्वरूपाचा असतो. त्यामुळे हा मजकूर आपण आपल्या मित्रपरिवारात पसरवायलाच हवा, अशी तीव्र भावना आपल्या मनात निर्माण होते.

  समाजमाध्यमातून आलेला एखादा मजकूर "जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोहोचवा" अशा आवाहनासह आला असेल, तर तो खोटी वार्ता असण्याची खूप दाट शक्यता असते.

- मजकूरातील माहितीसाठी कोणतेही संदर्भ दिलेले नसतात. ही माहिती आपण गुगल सर्चद्वारे पडताळली, तर त्याचे काहीही पुरावे मिळत नाहीत, किंवा जे मिळतात तेही आपण वाचत असलेल्या मजकुरासारखेच मोघम असतात, आणि त्यांचे स्रोत आपण कधीही न ऐकलेली व न पाहिलेली अशी प्रकाशने, वेबसाईट वगैरे असतात. बरेचदा त्या प्रकाशनांचे व वेबसाइटचे कर्ते कोण आहेत, याचा शोध घेतला, तर त्यातून ही खोटी वार्ता कोणी व काय उद्देशाने बनवलेली आहे, यावर प्रकाश पडतो.

- मजकुरात छायाचित्र असेल, तर गुगलने उपलब्ध करून दिलेल्या गुगल इमेज सर्चचा वापर करून आपण त्या छायाचित्राचा मूळ स्रोत शोधू शकतो.

'द वायर' इ-मासिकातील लेखाइतक्याच त्याखालच्या वाचकांच्या प्रतिक्रिया महत्त्वाच्या आहेत. बरेच लोक मॅकॅलेच्या या तथाकथित भाषणाला खोटे मानू इच्छित

नाहीत, असे दिसते. लेखाच्या लेखकावरच खोट्या वार्ता पसरवत असल्याचा आरोप काहींनी केला आहे. मकॅलेचा हेतू वाईटच होता ना, मग काय बिघडले त्याची बदनामी केली तर, असाही सूर काही प्रतिक्रियांमध्ये दिसतो. खोट्या वार्तांनी आपली बुध्दी किती भ्रष्ट केली आहे, याचे या प्रतिक्रिया हे एक उत्तम उदाहरण आहे. गंमत म्हणजे आपली संस्कृती कशी श्रेष्ठ हे सांगण्यासाठी मकॅले या भारतात आधीच खलनायक मानल्या गेलेल्या पाश्चात्याची साक्ष आपण काढू पाहत आहोत, यातला विरोधाभासही लोकांना दिसत नाही. जिज्ञासूंनी हा लेख व प्रतिक्रिया जरूर पहाव्यात.

लिंक आहे - https://thewire.in/history/macaulays-speech-never-delivered

गेल्या काही वर्षांतल्या माझ्या निरीक्षणानुसार खोट्या वार्तांचे ढोबळमानाने पुढील प्रकार आहेत.

१. प्रसिध्द व्यक्तीची बदनामी करण्यासाठी किंवा स्तुती करण्यासाठी दिशाभूल करणारी माहिती, फोटोशॉपने बदललेली छायाचित्रे, सोयीस्कर संपादन केलेले व्हिडिओ इ. चा वापर करून बनवलेली वार्ता.

२. आरोग्याशी संबंधित काहीतरी नवे संशोधन सांगत आहोत, अशी बतावणी करून तथाकथित पारंपरिक उपचारपध्दतींचे किंवा काही विशिष्ट भाज्या-फळांचे किंवा देशी गायींचे वगैरे उदात्तीकरण करणाऱ्या वार्ता. यामध्ये वैज्ञानिक संज्ञा वापरून अत्यंत अशास्त्रीय माहिती व तर्क दिलेले असतात (उदा. माठातले पाणी आतून बाहेर नैसर्गिकरित्या गार होत असते तर फ्रीजमधील पाणी बाहेरून जबरदस्तीने गार केले जाते, म्हणून माठातले पाणी पिणे जास्त आरोग्यदायक आहे, देशी गायीच्या शेणांनी घर सारवले तर अणुबॉम्बच्या स्फोटानंतरच्या किरणोत्सारापासूनही आपले संरक्षण होते, इ. ). बरेचदा कोणत्यातरी पाश्चात्य विद्यापीठाच्या किंवा संशोधकाच्या नावावर हे सारे खपवलेले असते. काहीवेळा तर भारतातच आरोग्यक्षेत्रात चांगले काम करणाऱ्या प्रकाश आमटे, अभय बंग, इ. पैकी कोणाचेतरी नाव लेखक म्हणून दिलेले असते.

३. पौराणिक भाकडकथांचे, पूर्वीपासून प्रचलित अंधश्रध्दांचे, तसेच भारतीय संस्कृतीतील काही विशिष्ट चालीरीती व पध्दती इ. चे समर्थन करणारे छद्मविज्ञान सांगणाऱ्या वार्ता (उदा. महाभारतात इंटरनेट होते म्हणूनच संजय धृतराष्ट्राला युध्दभूमीचा दैनंदिन वृत्तांत देऊ शकला, तुळस इतर झाडांपेक्षा जास्त ऑक्सिजन निर्माण करते म्हणून अंगणात तुळस लावावी, इ.) अशा वार्तांमध्ये बरेचदा नासा, आईनस्टाईन, ओपनहायमर, इ. चा नाहीतर नेचर वगैरे नामांकित नियतकालिकांचा हवाला दिलेला असतो.

४. एखादी नैसर्गिक आपत्ती येत असल्याचा किंवा आली असल्याचा किंवा कोणाचेतरी छायाचित्र टाकून ती व्यक्ती फरार असल्याचा किंवा हरवली अथवा सापडली असल्याचा दावा करणाऱ्या वार्ता. मुख्यतः घबराट निर्माण करणे, लोकांना त्रास देणे, एवढाच याचा हेतू असतो. एखाद्या वेळी खोडसाळपणे अधिक माहितीसाठी संपर्क म्हणून कोणाचातरी दूरध्वनी क्रमांक वगैरेही दिलेला असतो. यामुळे ती व्यक्ती लोकांना तोंड देता देता हैराण होऊन जाते.

५. दैवी चमत्काराबद्दल माहिती देणारी वार्ता. ही अंधश्रध्दांच्या निर्मितीची नवी पध्दत आहे. एखादा बुवा, साध्वी, किंवा देव, तीर्थस्थान, इ. ची थोरवी सांगण्याचा हा प्रकार असतो.

६. एखाद्या विशिष्ट समूहाविरुध्द विखारी प्रचार करणारी वार्ता. त्यासाठीही मनच्या रचलेल्या घटना, किंवा घडलेल्या घटनांचे विपर्यस्त वर्णन, फोटोशॉप केलेली किंवा संदर्भ सोडून उचलेली छायाचित्रे, व्हिडियो (उदा. इतर देशांतील प्रसंग किंवा चित्रपटातील दृष्ये), इ. चा वापर केलेला असतो.

या खोट्या वार्ता कशा तयार केल्या जातात, व्हॉट्सॅप व फेसबुकसारख्या समाजमाध्यमांतून कशा पसरवल्या जातात, आणि हळूहळू शहाण्यासुरत्या माणसांनाही आपल्या जाळ्यात कशा ओढतात, याबद्दल काही लोकांनी संशोधन केले आहे. काही लोकांनी तर खोट्या वार्तांचा खोटेपणा उघडकीला आणणे, हेच आपल्या आयुष्याचे ध्येय




ठरवले आहे, आणि सत्यशोधन संकेतस्थळे (उदा. अल्ट न्यूज, फॅक्टचेकर डॉट इन इ. ) तयार केली आहेत. पण आभाळच फाटले आहे, त्याला कुठेकुठे ठिगळे लावणार, अशी परिस्थिती आहे. लोकांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन रुजला तरच या प्रकाराला आळा बसेल. कारण खोटी वार्ता तयार करणारा ती काहीशे लोकांपर्यंत पोहोचवेल. पण या काहीशेपैकी बहुसंख्य लोक ती आपल्या संपर्कातल्या प्रत्येकी काहीशे लोकांपर्यंत पोहोचवतात, आणि ही साखळी अशीच चालू राहून अल्पावधीत ही वार्ता कोट्यवधी लोकांपर्यंत पोहोचते. यातल्या पहिल्या टप्प्यातच बहुसंख्य लोकांनी ही वार्ता पुढे जाऊ दिली नाही, आणि अशा वार्ता पाठवणाऱ्याला आपल्या संपर्क यादीतून हद्दपार केले, तर वार्ता बनवणाऱ्याच्या उद्दिष्टावरच पाणी पडेल. असे काही झाल्याखेरीज हा सामाजिक रोग नाहीसा होणार नाही. प्रत्येक खोट्या वार्तेचे सत्यशोधन आणि असत्याचे खंडन हा वेळखाऊ, खर्चिक आणि तात्पुरता मार्ग आहे. यातून आपण केवळ लक्षणांवर तात्कालिक उपाययोजना करू शकू. तीही महत्त्वाची आहेच, पण मुळावर घाव घालण्यासाठी सर्व विवेकी लोकांनी तर्कबुध्दीची आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाची मात्रा अधिकाधिक लोकांना देण्यासाठी एकत्रित प्रयत्न करणे जास्त महत्त्वाचे आहे.



लेखक : **प्रियदर्शिनी कर्वे**, समुचित एन्व्हायरो टेक, पुणे याच्या संस्थापक, संचालक
pkarve@samuchit.com

राष्ट्रीय वैज्ञानिक दृष्टिकोन दिवसाच्या आयोजनासाठी उपयुक्त साहित्य, व्हिडिओ, इ. साठी http://aipsn.net या वेबसाइटवर Resources हे पान  पहात रहा.